उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमां-
मध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यां
करिता शिष्यवृत्ती योजनेसाठी सन २०१०-११ करिता
अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत .

---

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्र.अविवि २०१०/प्र.क्र. ११२/१०/का-६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ नोव्हेंबर,२०१०

संदर्भ :- शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र.अविवि २०१०/प्र.क्र. ११२/१०/का-६,
दि. २२.७.२०१० व दि.२०.९.२०१०.

**शासन निर्णय :**

संदर्भांकित शासन निर्णयान्वये राज्यातील अल्पसंख्यांक समाजातील उच्च व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिकत असलेल्या आर्थिक दृष्टया कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजना सन २०१०-११ मध्ये सुधारित स्वरुपात राबविण्यास मंजूरी देण्यात आली आहे. शासन निर्णय दि. २०.९.२०१० अन्वये या योजनेच्या अंमलबजावणीसाठी करण्यात आलेल्या रु. २६.०० कोटी इतक्या एकूण अर्थसंकल्पित तरतुदीच्या ५० टक्केच्या मर्यादेत रु.१३.०० कोटी एवढा निधी संबंधित यंत्रणांना वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरित ५० % निधीपैकी एकूण निधीच्या ३० % इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने त्यांचे परिपत्रक क्र. अंदाज २०१०/प्र.क्र.१७३/२०१०/ अर्थसंकल्प-३, दि.२१.९.२०१० अन्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार वितरणासाठी उपलब्ध रु.७.८० कोटी पैकी रु. ७.०२ कोटी इतकी रक्कम संचालक (तंत्र शिक्षण), तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून सदर रकमेपैकी रु.३९.०० लक्ष इतकी रक्कम इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरिता लागू असलेल्या शिष्यवृत्ती योजनेसाठी राखीव ठेवण्यात यावी. या दोन्ही प्रयोजनार्थ ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. उर्वरित रु. ७८ लाख एवढी रक्कम संचालक (वैद्यकीय शिक्षण) वैद्यकीय शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

२. संचालक (तंत्र शिक्षण), तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सन २०१०-११ करिता वितरीत करावयाच्या एकूण रु.७.०२ कोटी (रुपये सात कोटी दोन लाख फक्त.) आणि संचालक (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सन २०१०-११ करिता मंजूर करण्यात आलेल्या एकूण रु.७८ लाख (रुपये अठ्ठयाहत्तर लाख फक्त. ) एवढया निधीच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

३. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-३३८)" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४.	सदर योजनेसाठी उर्वरित निधी वितरीत करण्यापूर्वी या योजनेसाठी यापूर्वी उपलब्ध करुन दिलेल्या संपूर्ण निधीच्या विनियोगाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करणे अनिवार्य राहील, या अटींच्या अधीन राहून उपरोक्त निधी वितरीत करण्यात येत आहे.

५.	हा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ९५३/१०/अर्थ-१४, दि. २०.११.२०१० अन्वये अनुदान वितरीत करण्यास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१०११२६१७२७०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
(उज्ज्वला दांडेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
महालेखापाल, १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
महालेखापाल, १/२, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
प्रधान सचिव , उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,मंत्रालय, मुंबई,
संचालक, उच्च शिक्षण, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे,
संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई,
संचालक, वैद्यकीय शिक्षण, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई,
संचालक (कृषी), कृषि संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, अर्थसंकल्प, (का-७),
निवडनस्ती, कार्यासन-६.